**माहे फेब्रुवारी २०२५ देय माहे मार्च २०२५ या कालावधीतील प्रवासी कर रु.३६,८८,८०,२७८/- चे म.रा.मा.प.महामंडळास शासनाचे भांडवली अंशदान म्हणून पुस्तकी समायोजन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र.एसटीसी- ०१२४/प्र.क्र.१५४/परि-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२५

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ३४००/६३१/सीआर-३१/परि १, दिनांक २० जुन, २०००.

२) शासन निर्णय क्रमांक : एसटीसी-०८१४/प्र.क्र.४७८/परि-१, दिनांक ४ जुलै, २०१५. व शुध्दीपत्रक दि.०८ सप्टेंबर, २०१५.

३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/अंववि/५९०, दि.२१.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळावर १७.५ टक्के या दराने प्रवासी कर आकारण्यात येतो. संदर्भाधिन क्र.१ येथील दि.२०.६.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर प्रवासी करातील १२ टक्के प्रमाणे येणारी रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास उपलब्ध करुन देण्यात यावी, असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. तद्नंतर संदर्भाधिन क्र.२ येथील दि.०४.०७.२०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास देण्यात येणारे भांडवली अंशदान ५.५ टक्के यावरुन १० टक्के एवढे वाढविण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे.

२. मागणी क्र.बी-१० ५०५५ महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ भांडवली अंशदान ५०५५ ००११- ३२ अंशदाने या लेखाशिर्षाखाली माहे फेब्रुवारी २०२५ देय माहे मार्च २०२५ या कालावधीतील प्रवासी कर रु.३६,८८,८०,२७८/- इतक्या रकमेचे म.रा.मा.प.महामंडळास शासनाचे भांडवली अंशदान म्हणून पुस्तकी समायोजन करण्याबाबत उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.३ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदर पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u>:-

माहे फेब्रुवारी २०२५ देय माहे मार्च २०२५ या कालावधीतील प्रवासी कर **रु.३६,८८,८०,२७८/- (अक्षरी छत्तीस कोटी अठ्ठ्याऐंशी लाख ऐंशी हजार दोनशे अठ्ठ्याहत्तर रुपये फक्त)** एवढी प्रवासी कराची रक्कम शासनाचे भांडवली अंशदान म्हणून महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास पुस्तकी समायोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम गृह विभाग, "मागणी क्र. बी-१०, ५०५५- मार्ग परिवहन यावरील भांडवली खर्च (००) १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाला भागभांडवली अंशदान, (अनिवार्य) (५०५५ ००११)" (योजनेत्तर) ३२ अंशदाने या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने खर्च दाखविण्यात यावी व लेखाशिर्ष "००४२ मालावरील व उतारुवरील कर -१०६- कर वसुली (००४२ ००६२) (०१) (०२) उतारुवरील करापासून मिळालेल्या जमा रक्कमा" या खाली पुस्तकी समायोजनाने प्रवासी कराची रक्कम जमा दाखविण्यात यावी. सदर पुस्तकी समायोजन सन २०२४-२०२५ या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून करण्यात यावे.

३. वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन करण्याची कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३६/२०२५/व्यय-८, दि.२७.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१७२१४६६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA ASHISH GANVIR

Digitally signed by SARIKA ASHISH GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA ASHISH GANVIR
Date: 2025.03.29 17:23:32 +05'30'

**(सारिका मेंढे (गणविर))**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) खाजगी सचिव, मा.मंत्री (परिवहन) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (परिवहन) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
८) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
११) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१३) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१४) संचालक, लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११/साऊ), मंत्रालय, मुंबई.
१७) गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती/कार्यासन परि-१